# एनी ओकले

## अचूक निशाणेबाज़

एरिक ब्लेर

मराठी :
अश्विनी बर्वे





एनी ओकलेचा जन्म १८६० मध्ये झाला.त्यांचं खरं नाव फोबे ऐन मोसी होतं.

त्या एक प्रतिभाशाली शार्पशूटर (अचूक निशाणेबाज़) होत्या.

त्या पहिल्या अमेरिकी महिला सुपरस्टार झाल्या. १९२६मध्ये एनीचा मृत्यू झाला.



जेव्हा एनी ओकली पाच वर्षांची होती, तेव्हा तिचे वडील मृत्यू पावले.



एनी भले छोटी होती, पण तिच्या डोळ्यात खूप तेज होते.

आपल्या कुटुंबाला खेळातून मदत करण्यासाठी एनी शुटिंग शिकली.



लोकांनी तिच्याद्वारे शिकार झालेले जनावरं खरेदी केली.

एनीने त्यातून इतका पैसा मिळवला की तिने आपल्या आईसाठी एक फार्म खरेदी केलं.



जेव्हा एनी केवळ सोळा वर्षाची होती, तेव्हा तिने पहिल्यांदा नेमबाजीच्या स्पर्धेत भाग घेतला.





एनीने एक प्रसिद्ध निशाणेबाज फ्रैंक बटलर च्या विरोधात नेमबाजी केली.

फ्रैंक छोटी मुलगी म्हणून हसले.
पण एनीने सगळ्या पंचवीस
लक्ष्यांवर अचूक गोळी मारली.
तिचा निशाणा अचूक होता.





पण फ्रैंक चुकले. फ्रैंक स्पर्धा हारले.
पण त्यांनी एनीचे मन जिंकून घेतले.
लवकरच त्या दोघांनी लग्न केले.

फ्रैंक आणि एनी वेगवेगळ्या
कार्यक्रमासाठी ट्रिक शुटिंग करू लागले.

एनीचे कौशल्य बघण्यासाठी
लांब लांबून लोक येत असत.



एका शूटिंग स्पर्धेत एनीला गोळी मारून कुत्र्याच्या डोक्यावरचे सफरचंद पाडायचे होते.





एनी मागे बघून नेम धरू शकत असे आणि चालणाऱ्या वस्तूंवर नेम धरू शकत होती.

ती आपल्या लक्ष्याकडे आरश्यातून बघत असे.

एनीला अजून एक ट्रिक खूप आवडत असे. ती हवेत फेकलेल्या नाण्यावर अचूक नेम धरत असे.



कधी-कधी एनी घोड्यावर स्वार होवून पण शुटिंग करत असे.



एनीची आवडती ट्रिक म्हणजे खेळण्याच्या पत्ता वर नेम धरणे.

जमीनीवर पडण्यापूर्वी ती पत्ताचे सहा तुकडे करू शकत असे.



एनीला सगळ्या युक्त्या माहीत होत्या आणि तिचे खूप सारे दोस्त होते. एवढंच नाहीतर तर प्रसिद्ध सिओक्स इंडियन चीफ - सिटिंग बुल सुद्धा तिचे मित्र होते.



सिटिंग बुलने त्यांना "लिटिल शुअर शॉट" हा सन्मान दिला.

थोड्या काळानंतर, एनीने बफेलो बिलच्या, वाइल्ड-वेस्ट शो मध्ये भाग घेतला.



मग एनी ओकले एक स्टार झाली.



एनीने सगळ्या जगाचा दौरा केला.

एनीच्या या दौरांमुळे ती मालामाल आणि प्रसिद्ध झाली.



एनी आपल्या पैशांच्या बाबत उदार होती. एकदा तिने टेक्सास मधल्या सगळ्या मुलांसाठी आईस्क्रीम खरेदी केले.

एनी ओकली छोटी होती, पण तिचं मन खूप मोठं होतं.

समाप्त